**राज्यातील १४५ मोठ्या बाजार समित्या राष्ट्रीय कृषि बाजार (ई-नामच्या) पोर्टलवर जोडणे. प्रशासकिय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं-०४१८/प्र.क्र.७० /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ६ जुलै, २०१८

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने शेतमालाच्या खरेदी विक्रीसाठी देशपातळीवर एक बाजार या संकल्पनेवर आधारीत राष्ट्रीय कृषि बाजार (National Agriculture Market [NAM]) ही योजना सुरु केली. ई-नाम योजनेत राज्यातील ६० बाजार समित्यांचा दोन टप्यामध्ये समावेश करुन ई-नाम ला जोडण्यात आल्या आहेत. पहिल्या टप्यातील ३० बाजार समित्यांमध्ये ई-लिलाव पद्धत सुरु झाली असून दुस-या टप्यातील ३० बाजार समित्यांमध्ये सुरु करणेबाबत कार्यवाही सुरु आहे. तसेच महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळामार्फत जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प अंतर्गत २५ बाजार समित्यांमध्ये ई-लिलाव पद्धतीची अंमलबजावणी सुरु आहे. ई-लिलाव पद्धतीमुळे बाजार समिती स्तरावरील लिलाव प्रक्रियेमध्ये सुसूत्रता व पारदर्शकता येऊन शेतकऱ्याला त्याच्या शेतमालास रास्त भाव मिळण्यास मदत होणार आहे. ई-लिलाव पद्धतीचे कामकाज अधिक परिणामकारक होण्यासाठी राज्यातील अन्य १४५ बाजार समित्यांमध्ये सदर पद्धतीची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

केंद्र शासनाची ई-नाम योजना राबवित असलेल्या राज्यातील एकूण ६० बाजार समित्या तसेच जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत ई-लिलाव योजना राबवित असलेल्या २५ बाजार समित्या अशा एकूण ८५ बाजार समित्या वगळून राज्यातील अन्य १४५ मोठ्या बाजार समित्या राष्ट्रीय कृषि बाजार (ई-नामच्या) पोर्टलवर जोडण्याबाबतच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१९. महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) मधील खालील तरतूदीनुसार ई-नाम योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

१) कलम ५ फ अन्वये इ-व्यापार स्थापन करण्यास इच्छुक असलेली कोणतीही व्यक्ती, विहित करण्यात येईल अशा नमुन्यात व रीतीने, अशी फी प्रतिभूती किंवा बँक हमी यांसह व अशा शर्तीच्या पूर्ततेसह संचालकाकडे किंवा त्याने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याकडे अर्ज करील.

२) एखाद्या व्यक्तीने किंवा राज्य शासनाने किंवा, यथास्थिति, शासकीय अभिकरणांनी व्यवस्थापन केलेल्या किंवा चालवलेल्या इ-व्यापार व्यासपीठामध्ये विहित करण्यात येतील अशा सर्व पायाभूत सुविधा आणि इ-व्यापाराशी संबंधित सर्व सेवा पुरविलेल्या असतील.

३) लायसनधारकास किंवा त्यांच्या अभिकर्त्यास, अशा लायसनधारकाने त्याच्या संकेतस्थळावर अधिसूचित केल्या असतील अशा, पुरविलेल्या सेवांवर वापरकर्ता आकार वसूल करता येईल.

४) भारत सरकारच्या इ-व्यासपीठाशी जोडून घेण्यास इच्छुक असणाऱ्या  कलम ५ग खालील लायसनधारकास, विहित करण्यात येईल अशा नमुन्यात आणि अशा रीतीने संबंधित शासनामार्फत किंवा शासकीय अभिकरणांमार्फत, कृषि, सहकार  व शेतकऱ्यांचे कल्याण (पणन) विभागाकडे अर्ज करता येईल.

५) एकसंघ राष्ट्रीय कृषि बाजार विकसित करण्यासाठी आणि विविध एकात्मिक इ-व्यापार व्यासपीठे एकत्रित करण्यासाठी इ-व्यापार व्यासपीठामधील विविध उपयोजना प्रणाली संचालकाद्वारे किंवा त्यासाठी पदनिर्देशित केलेल्या प्राधिकाऱ्याद्वारे निर्धारित केलेल्या विनिर्देश व प्रमाणके यांनुसार इतर इ-व्यापार व्यासपिठांसोबत माहितीची देवाण-घेवाण व वापर करता येईल.

६) इलेक्ट्रॉनिक व्यापार व्यासपिठावरुन व्यापार केलेल्या कृषि उत्पन्नाची कार्यवाहीच्या दृष्ट्या तसे करणे आवश्यक असल्यास, तत्कालीन दराने त्याच दिवशी किंवा जास्तीतजास्त दुसऱ्या दिवशी विक्रेत्याला विक्रीच्या व्यवहाराची रक्कम प्रदान करण्यात येईल. इलेक्ट्रॉनिक व्यापार करताना कार्यवाहीच्या संबंधात निकड भासल्यास, विक्रेत्याला नियमांद्वारे विहित करण्यात येईल त्या रितीने रक्कम प्रदान करता येईल.

७) लायसनधारक किंवा, यथास्थिति, कृषि उत्पन्न बाजार समिती, इलेक्ट्रॉनिक व्यापार व्यासपिठावर करण्यात आलेल्या सर्व व्यवहारांचे लेखे ठेवील आणि असे नियतकालिक अहवाल व विवरणे पणन संचालक वेळोवळी निर्धारित करतील अशा वेळी व अशा स्वरुपात, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ किंवा प्राधिकृत अधिकारी यांच्याकडे सादर करील.

८) संचालकास कारणे लेखी नमूद करुन आदेशाद्वारे, कलम ५ग अन्वये देण्यात आलेले लायसन निलंबित किंवा रद्द करता येईल. अधिनियमाच्या कोणत्याही तरतुदींचा किंवा नियमांचा किंवा उप-विधीचा, अनुदेश, आदेश किंवा मार्गदर्शक तत्वे यांचा भंग झाल्यास ते अशा आदेशामये विनिर्दिष्ट करण्यात येईल. परंतू, लायसन निलंबित करण्याचा किंवा रद्द करण्याचा कोणताही आदेश त्याला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज देता येणार नाही.

९) ई-व्यापार व्यासपिठाच्या लायसनधारकांमध्ये किंवा त्यांच्या संबंधीत किंवा लासनधारक व कृषि उत्पन्न बाजार समिती किंवा शासकीय अभिकरणे यांच्यामध्ये किंवा यांच्या संबंधात कोणताही विवाद उद्भवल्यास, पक्षकारांना त्यांचे म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर तीस दिवसांच्या आत संक्षिप्त रितीने संचालक किंवा त्याने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना मिटवता येईल.

१०) कलम ५ग खालील प्रत्येक लायसनधारकावर इ-व्यापार करताना पुढील आबंधने असतील.

अ) त्याचा व्यवहार घडून येण्यापूर्वी कृषि उत्पन्नाचा दर्जा निर्धारित करणे.

ब) व्यापारी व अडत्यांच्या हस्तक्षेपावाचून उचित व पारदर्शक रीतीने उत्पन्नाचा लिलाव करणे किंवा किंमत ठरविण्याची दुसरी कोणतीही पद्धत वापरणे.

क) सर्व व्यवहारांची तत्कालीन दरानुसार नोंद ठेवणे आणि महाराष्ट्र राज्य कृषि उत्पन्न पणन मंडळाच्या, ॲग्रिमार्क नेटच्या पोर्टलवर किंवा संचालकाद्वारे विहित करण्यात येईल अशा नमुन्यात तत्कालीन दरानुसार सममुल्य बाजाराची माहिती प्रदर्शित करणे.

ड) कोणताही भेदभाव किंवा पक्षपात न करता, यासंबंधात राज्य शासनाने तयार केलेल्या नियमांद्वारे विहित केलेल्या कालमर्यादेत जी अर्ज करण्याच्या दिनांकापासून मोजण्यात येईल, इ-व्यापारासाठी पात्र असलेल्या सर्व व्यापाऱ्यांना, लायसन देणे.

इ) शेतकऱ्यांच्या गरजा भागविण्याकरिता स्वच्छता व प्रतवारी आणि वखार (निर्जल व शीतगृह) यांसाठी सुविधा पुरविणे.

फ) अत्याधिक व्यापार करण्याची परवानगी न देणे.

११) इलेक्ट्रॉनिक व्यापार व्यासपिठावरुन व्यापार करण्यास इच्छूक असणारी कोणतीही व्यक्ती, याबाबतीत विहित करण्यात येईल त्याप्रमाणे अशा प्राधिकाऱ्याकडून व्यापारी म्हणून नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त करील.

१२) व्यापारी म्हणून नोंदणी करण्यासाठीचा अर्ज ऑनलाईन आणि विहित करण्यात येईल त्याप्रमाणे अशा नमुन्यात करण्यात येईल.

१३) डिजिटल स्वाक्षरी असलेले नोंदणी प्रमाणपत्र, विहित करण्यात येईल अशा नमुन्यात सक्षम प्राधिकाऱ्याकडून निर्गमित करण्यात येईल.

१४) सक्षम प्राधिकाऱ्यांचे असे मत असेल की, एखादी व्यक्ती ही ऑनलाईन व्यापार करताना अहितकारी कृती करीत असल्याचे आढळून आले आहे, किंवा कोणतेही सबळ कारण न देता त्या व्यक्तीने सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी व्यापार केलेला नाही किंवा तिची बँकेतील गतिशील रोख पत मर्यादा संपली आहे किंवा विक्रेता, खरेदीकर्ता, कमिशन अडत्या,

पर्यवेक्षण परिव्यय, बाजार शुल्क व अधिनियम, नियम व उपविधी याअन्वये कोणतीही अन्य प्रदाने, यांच्या ऑनलाईन भरणा करण्यास कसूर केली आहे, तर त्यास कारणे लेखी नमूद करुन व्यापार करण्यासाठीचे नोंदणी प्रमाणपत्र देण्यासाठी किंवा त्याचे नवीकरण करण्यासाठी नकार देता येईल. नोंदणी किंवा नोंदणीचे नवीकरण, कोणतेही असल्यास, मान्य करण्यात आले नाही तर, अर्जदारास त्याबाबतची कारणे नमूद करुन तसे कळविण्यात येईल आणि नोंदणी शुल्क भरले असेल तर, ते बाजार निधीत किंवा यथास्थिति, राज्य शासनाकडे जमा करण्यात येईल.

१५) इलेक्ट्रॉनिक व्यापार करण्यासाठी ज्या व्यक्तीच्या नावाने नोंदणी प्रमाणपत्र देण्यात आले असेल त्याच व्यक्तीच्या बाबतीत ते वैध असेल आणि ते प्रमाणपत्र अहस्तांतरणीय असेल.

१६) पारदर्शकता आणि उचित रीतीने किंमत शोधन याबाबतच्या, नियमांचा भंग केला असेल किंवा उपलब्ध असलेल्या रोख कर्ज मर्यादेपेक्षा लबाडीने अत्याधिक व्यापार करीत असेल किंवा व्यापारी वस्तू व अधिनियम, नियम व उपविधि यांन्वये इतर प्रदाने यांसाठी तत्कालीन दराच्या आधारे ऑनलाईन भरणा करण्यास नकार दिला असेल किंवा फसवेगिरी करुन नकार दिला असेल तर सदर नोंदणी प्रमाणपत्र निलंबित किंवा रद्द होण्यास पात्र असेल.

१७) अशाप्रकारे देण्यात आलेले किंवा नवीकरण केलेले प्रत्येक नोंदणी प्रमाणपत्र हे, ते दिल्याच्या किंवा त्याचे नवीकरण केल्याच्या दिनांकापासून तीन वर्ष इतक्या कालावधीपर्यंत अंमलात असेल.

१८) इलेक्ट्रॉनिक व्यापार व्यासपीठ असणारी प्रत्येक बाजार समिती आणि खाजगी बाजार, बाजारात इलेक्ट्रॉनिक व्यापार व्यासपिठाचा वापर करण्याची नोंदणी असणाऱ्या व्यापाऱ्यांकरिता, सर्व नोंदणी प्रमाणपत्रांची सूची ऑनलाईन प्रसिद्ध करील.

३. राज्यात १४५ मोठ्या बाजार समित्यांमध्ये ई-लिलाव पद्धतीची अंमलबजावणी करण्यासाठी ई-नाम योजनेनुसार संगणक प्रणाली,त्यासंदर्भातील प्रशिक्षण आणि एक प्रशिक्षीत कर्मचारी (एक वर्षासाठी), आवश्यक सामुग्री खरेदीव इतर अनुषंगीक बाबी विचारात घेऊन येणाऱ्या खर्चाकरीता आवश्यक निधीची तरतूद स्वतंत्रपणे करण्यात येईल.

४. सदर बाजार समित्या "राष्ट्रीय कृषी बाजार (ई-नाम)" पोर्टलशी जोडल्यानंतर "संगणकीय प्रणाली" शेतकऱ्यांना उपलब्ध राहण्याकरीता येणारा वार्षिक देखभाल दुरुस्तीचा खर्च संबंधित बाजार समितीने त्यांना महाराष्ट्र कृषी उत्पन्न (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मधील तरतुदींनुसार प्राप्त होणाऱ्या निधीमधून (उत्पन्नामधून) करावा.

५. या योजनेसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांची समन्वय संस्था (Nodal Agency) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०६११३७३७७४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.07.06 17:15:36 +05'30'

**(जयंत भोईर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा / विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
३) मा.मंत्री (कृषि / पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (कृषि/पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (कृषि व पणन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
८) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे
९) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
११) सर्व कृषि उत्पन्न बाजार समित्यांचे सचिव
१२) उप सचिव (पणन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव(१७-स),स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) निवडनस्ती (२१-स)